औरंगाबाद महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दिनांक ०४/१२/२००८ रोजी पारित केलेला ठराक्र.१४८,विखंडीत करण्यासाठी निलंबित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगरविकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: याचिका २०१४/प्र.क्र.१०५/२०१४/नवि-२४,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दि. १६ मे, २०१७

<u>वाचा:</u>- १) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था-२/२००९/१२५ दि.२९/०१/२००९.

<u>प्रस्तावना :-</u>

औरंगाबाद महानगरपालिकेत एकूण ५५ सुरक्षा रक्षकांची मंजुर पदे आहेत. सुरक्षा रक्षकांची पाचव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रू.२७५०-४४०० इतकी आहे. औरंगाबाद महानगरपालिकेच्या स्थायी समितीने ठराव क्र. १४८ दि.०४/१२/२००८अन्वये पाचव्या वेतन आयोगानुसार औरंगाबाद महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील माजी सैनिकातील पात्र सर्व सुरक्षा रक्षकांना वेतनश्रेणी रु.२७५०-४४०० ऐवजी रू.३०५०-७५-३९५०-८०-४५९० ही सुधारीत वेतनश्रेणी ठराव मंजूर झाल्याच्या दिनांकापासून ३१ सुरक्षा रक्षकांना लागु करण्यास शासनाच्या मान्यतेच्या अधीन राहून मंजुरी दिली होती. त्याअनुषंगाने औरंगाबाद महानगरपालिकेने याबाबत दि. २९.१.२००९ रोजी आदेश निर्गमित केले व सदर सुधारीत वेतनश्रेणी ही शासनाच्या मान्यतेच्या अधीन राहून दि.०४/१२/२००८ पासून सुरक्षा रक्षकांना लागू करण्यात आली. औरंगाबाद महानगरपालिकेने सुरक्षा रक्षकांना सदर सुधारीत वेतनश्रेणी देताना पाचव्या वेतन आयोगानुसार पोलीस शिपाई यांच्या वेतनश्रेणीत वाढ झाल्यामुळे महानगरपालिकेतील कार्यरत सुरक्षा रक्षकांच्या वेतनश्रेणीत वाढ केल्याचे नमुद केले आहे.तथापी, आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांचेकडून प्राप्त स्पष्टीकरणावरुन असे दिसुन येते की,

१) स्थायी समितीने मंजूर केलेल्या ठराव क्र. १४८ दि. ४.१२.२००८ अन्वये महानगरपालिकेने शासनाची मान्यता न घेता सुरक्षा रक्षकांना वाढीव वेतनश्रेणी लागू केली असून सदरची कार्यवाही महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५१ मधील तरतुदीशी विसंगत आहे.

२) पोलीस शिपाई व महानगरपालिकेचे सुरक्षा रक्षक यांचे कर्तव्य व जबाबदाऱ्या भिन्न असल्याने पोलिस शिपायांच्या वेतनश्रेणीत झालेली वाढ ही महानगरपालिकेतील कार्यरत सुरक्षा रक्षकांना देणे संयुक्तिक वाटत नाही.

३) औरंगाबाद महानगरपालिकेच्या स्थायी समितीच्या ठरावामध्ये उल्लेख केलेले ठाणे,नाशिक व पिंपरी चिंचवड महानगरपालिका या " ब" वर्ग व "क" वर्ग या संवर्गातील असून औरंगाबाद महानगरपालिका ही सदर ठरावाच्यावेळी "ड" वर्गातील होती. त्यामुळे सदर महानगरपालिकांशी औरंगाबाद महानगरपालिकेची तुलना करणे योग्य नाही.

४) सदर सुधारीत वेतनवाढ मंजूर करताना **सुरक्षा रक्षक** या पदाच्या जबाबदारीत व कर्तव्यात कोणतीही वाढ होणार नसल्याचे आयुक्तांनी नमुद केलेले आहे.

उपरोक्त नमुद बाबी विचारात घेऊन सदरचा ठराव क्र. १४८ दि. ४.१२.२००८ निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

औरंगाबाद महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दिनांक ०४/१२/२००८ रोजी पारित केलेला ठराक्र.१४८ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ५१ (४) तरतुदींचा उल्लंघन करणारा असल्याने तसेच महानगरपालिकेस आर्थिकदृष्ट्या अहीतकारक असल्याने सदरचा ठराव क्रं १४८ दि.०४/१२/२००८ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१(१)अन्वये प्रथमत: निलंबीत करण्यात येत आहे.

सदर निलंबनाप्रकरणी संबंधितांना अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांना निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत शासनास अभिवेदन करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक. २०१७०५१७११००१३१०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Anish Raman Parshurame

Digitally signed by Anish Raman Parshurame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ec58fef33f1b3244a3957d134f915dcb444ab4953880ff670e5eca3d7a9f53b, cn=Anish Raman Parshurame
Date: 2017.05.17 11:05:46 +05'30'

**(अनिष परशुरामे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका.
३) नगर सचिव, औरंगाबाद महानगरपालिका.
४) मा.सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई.
५) उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई.
६) माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दी करिता).
७) निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती)